उपचारः—उबदार अशा जागेत रोग्यास बिछान्यावर निजून रहाण्यास सांगावें. त्यानें दिवसांतून शक्य असेलत्या-मानानें बरेच वेळां कंबरेपर्यंत कढत पाण्यांत एका पातेल्यांत अगर टबांत बसावें. त्यांतून बाहेर येऊन निजल्यावर ओटीपोट सौम्य तऱ्हेनें शेकावें.

पथ्यः—खाण्यास फक्त थंड अगर गरम स्वच्छ पाणी घातलेलें दूध, भात व इतर पिष्टमय हलके पदार्थ व तूप-लोण्यासारखे थोडे स्निग्ध पदार्थ द्यावे. मद्य अगदीं वर्ज्य करावें. लघवी अम्ल असल्यास पोटात सोडाबायकार्बनेट किंवा सायट्रेट हा क्षार द्यावा. ती जर अल्कयुक्त असेल तर यूरो-ट्रोपिन अगर दुसरीं जंतुघ्न औषधें पोटांत द्यावीत. लघवीच्या वेळीं कुंथण्यास लागून त्रास होत असेल तर ¼–½ ग्रेन मार्फिया असलेली सोंगटीच्या आकाराची गोळी दर ३।४ तासांनीं मूत्रद्वारांत ठेवावी. शौचास साफ होत जाईल अशी व्यवस्था ठेवावी. लघवी अति दुर्गंधिमय असेल तर जंतुघ्न औषध रबरी शलाकेच्या मार्गानें मूत्राशयांत घालून तें इंद्रिय धुवावें. शलोकस २।३ फूट रबरी नळी जोडून तींत नरसाळ्यांतून जंतुघ्न औषध घालावें.

**मूत्रावरोध** (मूत्रकृच्छ्र)—जेव्हां लघवी आपोआप होऊं शकत नाहीं त्या स्थितीस हें नांव आहे. उरुस्तंभ, मेंदूचे रोग व पृष्ठरज्जूच्या इजेमुळें ह्या शक्तीचा नाश होतो.

उपाय.—या बाबतींत इतकेंच शक्य आहे कीं दिव-सांतून दोन तीन वेळां मूत्रशलाकेनें लघवी काढावी व मूत्राशय जंतुघ्न औषधांनीं धुवावें. चैतन्य उत्पन्न करण्या-साठीं पोटांत योग्य औषधें द्यावीत. मूत्रकृच्छ्र, मूतखडा, प्रोस्टेटवृद्धि या कारणांनीं मूत्रमार्गांत प्रतिबंध होतो. याचीं गर्भाशयोन्मादवायु, गर्भाशयाचा दाब, मलद्वाराचे व्याधी, किंवा तेथील मूत्रमार्गावरील शस्त्रक्रिया हीं अन्य कारणें होत. त्यावरील योग्य ते उपाय करावेत.

नष्ट मूत्र.—पटकीमध्यें व मूत्रपिंडाच्या कांहीं अवस्थां-मध्यें मूत्रच मुळीं तयार होत नाहीं, त्या स्थितीस हें नांव आहे. याचें वरील व्याधीशीं लघवी फक्त न होण्यांत साम्य असतें. पण पोट तपासलें असतां किंवा मूत्रशलाका मूत्राशयांत घातली असतां तें रिक्त असल्याचें आढळतें.

मुलास अंथरुणांत लघवी होते त्यास योग्य संवय लावून रात्रींतून दोन वेळां मुलांस उठवून लघवी करवून निजवावें म्हणजे ही खोड नाहींशी होते. पोटांत लोहयुक्त बेलाडोनाचा अर्क कांहीं आठवडे द्यावा. मुलास उताणें निजवूं नये.

**मूत्राशयभंग**—मूत्राशयभंग हा लाथ किंवा मार लाग-ल्यानें होतो अथवा अंगावर गाडीचें चाक जाऊन किंवा कटि-रास्थि भंग होऊनहि ही इजा होते. मूत्राशयाचा कांहीं भाग अंत्रावरणानें झांकलेला नसतो, तेथें जर ही इजा झाली तर शस्त्रक्रियेनें तो शिवून टाकून रोगी वचावतो. इतर भाग



मात्र अंत्रावरणदाह होऊन रोगी मरतो. हें इंद्रिय फाटल्याची निव्वळ शंका आली असतां प्रथम मूत्रशलाका घालून रक्तमिश्रित लघवी निघाल्यास मोजून पाणी मूत्रा-शयांत भरावें व शलाका घालून तितकेंच पाणी परत न आल्यास मूत्राशय फाटला आहे असें समजून शस्त्रक्रियेनें तो शिवावा. लवकर शस्त्रक्रिया केल्यास यशप्राप्ति होते.

झुबकेदार ग्रंथी.—बारीक तंतू, धागे व फाटे असलेल्या गांठी एखाद्या झुडुपाप्रमाणें मूत्राशयाच्या खालीं उगवतात पण त्या सौम्य स्वरूपी असतात. म्हणजे त्या इतर भागांत शिरकाव करून रोग्याचें जीवित धोक्यांत घालीत नाहींत. त्यांत रक्तवाहिन्या अतिशय असल्यामुळें एखादा तंतू दुखा-वला कीं, लघवींत रक्त येतें. पण त्यापासून त्रास व पीडा फारशी होत नाहीं हें या रोगाचें एक लक्षण समजतात. असे तुकडे लघवींत सांपडले तर शंकाच नको. ओटीपोटावर छेद करून चिमट्यानें ती गांठ उपटून काढतात किंवा तोड-तात आणि ती निघाली म्हणजे रोग साफ बरा होतो.

दुष्ट ग्रंथी (क्यान्सर)—आंतील त्वचेच्या एपिथेलियम पापुद्ऱ्याच्या ठिकाणीं लहान कालीफ्लॉवरच्या गड्ड्याप्रमाणें बारीक गांठ होते व तीस देंठाप्रमाणें कांहीं नसतें. वरचेवर लघवी होणें व ती नकळत होणें इत्यादि लक्षणांनीं रोग्यास त्रास होतो. शस्त्रक्रिया करणें जेथें शक्यच नसतें अशा वेळीं फक्त बोरीकच्या पाण्यानें मूत्राशय धूत जावा म्हणजे रोग्यास बरें वाटतें. एकंदरींत हा रोग असाध्यच आहे.

मूत्राशयाचें स्थूलीभवन.—मूत्रकृच्छ्र इत्यादि कार-णांनीं मूत्रमार्गांत दीर्घ काळपर्यंत अडथळा उत्पन्न होऊन बसल्यास, अगर प्रोस्टेटपिंडवृद्धीनेंहि लघवी अति वेळ सांच-ल्यानें मूत्राशयाचे स्नायू व पडदे जाड व पुष्ट होतात. हीच स्थिति बराच वेळ टिकून मूत्रोत्सर्जनाची अडचण दीर्घकाल टिकली म्हणजे या पुष्टतेऐवजीं तेच स्नायू व पडदे अति श्रम पडून क्षिजून पातळ होतात. या उलट अवस्थेस मूत्राशय-विरलता किंवा क्षीणता असें म्हणतात.

मूत्राशयस्तंभ.—दुखापत होऊन पृष्ठरज्जु दुखावली अगर दबली गेली असतां मूत्र कोंडणें अगर नकळत लघवी होणें हीं लक्षणें या व्याधींत होतात. कारण पृष्ठरज्जूच्या कमरें-तील गात्रांमध्यें मूत्रोत्सर्जननियामक मज्जास्थान असतें त्याचे व्यापार बंद पडतात. अशा अर्धवट स्थितीस मूत्राशय-दुर्बलता म्हणतात. दोन्ही व्याधींस उपाय म्हणजे इतकाच कीं मूत्राशय मूत्रानें फुगण्याच्या अगोदरच वेळेवर शलाकेनें लघवी काढणें व ज्या मेंदूच्या वगैरे व्याधींमुळें अशी अवस्था झाली आहे त्या व्याधींवर योग्य इलाज करणें.

**मूर**—हल्लीं हें नांव स्थूलमानानें मोरोक्कोच्या कोणत्याहि रहिवाशाला लावतात. परंतु वास्तविक रीत्या, फक्त मिश्र वंशाच्या गांवकऱ्याला तें लावलें जातें. याअर्थी बर्बरी संस्थानां-तील इतर मुसुलमान गांवकऱ्यासंबंधानेंहि तें उपयोगांत येतें. हिब्रू व फोनिशियन महूर (म्ह. पाश्चात्त्य) या शब्दापासून मूर हें नांव पडलें असावें असें कांहींचें मत आहे. परंतु मानववंशशास्त्रदृष्ट्या मूर ह्या शब्दाला विशेष महत्त्व नाहीं.

